जलशुध्दीकरण यंत्रे खरेदी करण्यास शासनाची
मंजुरी मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय: क्रमांक-एमएजे-०१९९/३/प्र.क्र.३५/पीआरएस-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ११ जुलै, २०००.

<u>पहा:-</u> १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-शुध्दीकरण यंत्र/१९९९/१३४/कक्ष-३,दिनांक ३.४.१९९९ व

२) क्रमांक-जलशुध्दीकरण यंत्र/१९९/१३४/क.३, दिनांक १२.१०.९९.

३) संचालक,उद्योग विभाग,नविन प्रशासन भवन,मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक-आरसीटी-५/१७/वॉटर फिल्टर कम प्युरी फायर/९९-२०००/बी.६६२९ दिनांक ६.९.९९.

<u>शासन निर्णय :-</u> राज्यातील सर्व मध्यवर्ती (आठ) कारागृहामध्ये जल शुध्दीकरण यंत्रे बसविण्यास व त्यासाठी येणारा खर्च भागविण्यास शासनाने प्रशासकीय मान्यता द्यावी अशी कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास विनंती केली आहे. कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे हे जलशुध्दीकरण यंत्रे (वॉटर फिल्टर कम प्युरीफिकेशन) कॉन्सेप्ट मार्केटींग, ठाणे या कंपनीकडून विकत घेणार असून या प्रत्येक जलशुध्दीकरण यंत्राची किंमत रुपये ८,६३०/- इतकी आहे व ही किंमत संचालक,उद्योग विभागाने ग्राहय मानली आहे.

२. कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास कळविले आहे की, कारागृहातील बंद्यांना पिण्याचे पाणी शुध्द मिळत नाही. त्यामुळे त्यांच्या आरोग्यावर परिणाम होतो ही बाब टाळण्यासाठी राज्यातील आठ मध्यवर्ती कारागृहांमध्ये जल शुध्दीकरण यंत्रे बसविल्यास कारागृहातील बंद्यांना पिण्याचे पाणी शुध्द मिळू शकेल. त्याकरिता प्रत्येकी ५ याप्रमाणे ४० जल शुध्दीकरण यंत्रे खरेदी करण्यास मान्यता मिळावी अशी शासनास विनंती केली आहे व त्यासाठी येणारा खर्च ते २०००-२००१ च्या मंजूर अनुदानातून भागविणार आहेत.

३. कारागृह महानिरीक्षक यांनी एकूण ४० जल शुध्दीकरण यंत्रे खरेदी करण्यास परवानगी मागितली असली तरी वित्त विभागाने प्रत्येक मध्यवर्ती कारागृहासाठी दोन याप्रमाणे १६ जल शुध्दीकरण यंत्रे खरेदी करण्यास व त्यासाठी येणारा खर्च रु.१,३८,०८०/- हा मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता दिलेली आहे. ही मान्यता विचारात घेऊन शासन राज्यातील आठ मध्यवर्ती कारागृहाकरिता १६ <u>जलशुध्दीकरण यंत्रे-कॉन्सेप्ट मार्केटींग या कंपनीकडून प्रत्येकी रु.८,६३०/- याप्रमाणे</u> खरेदी करण्यास व त्यासाठी येणारा एकूण खर्च रु.१,३८,०८०/- हा चालू वर्षाच्या २०००-२००१ मंजूर अनुदानातून भागविण्यास या आदेशाद्वारे मान्यता देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च, मुख्य लेखाशीर्ष "२०५६-तुरुंग १०१(१) मध्यवर्ती कारागृह २०५६००३५,२० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व तो आर्थिक वर्ष २०००-२००१ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-२१३५, दिनांक ३०.६.२००० च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

गु.ज.कुळकर्णी

( गु.ज.कुळकर्णी )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,येरवडा,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,ठाणे.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,नागपूर.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,औरंगाबाद.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,दक्षिण विभाग,मुंबई.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,नाशिक.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,अमरावती.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,कोल्हापूर.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,पुणे.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,ठाणे.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,नागपूर.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,औरंगाबाद.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,मुंबई.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,नाशिक.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,अमरावती.

मध्यवर्ती कारागृह अधिक्षक,कोल्हापूर.

महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.

महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा) मुंबई.

महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.

महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.

जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोल्हापूर.

वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.

अवर सचिव,गृह विभाग (पीयुडी-१) मंत्रालय,मुंबई.

निवडनस्ती पीआरएस-२.